राष्ट्रीय जलविज्ञान प्रकल्पांतर्गत सन २०१८-
२०१९ मध्ये रू. २.९०६७ कोटी किंमतीच्या
खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः जलवि-२०१५/प्र.क्र.१२०/पापु-१५

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीख: २४ ऑगस्ट, २०१८

**वाचा :-**

१) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** जलवि-२०१५/प्र.क्र.१२०/पापु-१५, दिनांक २९/०१/२०१८
२) **संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे पत्र क्रमांकः** जा.क्र.भूसविय/जविप्र/ ३८१/२०१८, दिनांक १५/०६/२०१८
३) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः** विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ दिनांक १७/०४/२०१५
४) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः** विअप्र-२०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दिनांक १९/०१/२०१६

**प्रस्तावना :-**

जागतिक बँकेच्या अर्थसहाय्याने केंद्र शासनामार्फत जलविज्ञान प्रकल्प राबविण्यात येत असून, या प्रकल्पांतर्गत राज्यात भूजलाच्या बाबतीत भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमार्फत विविध विकास कामे हाती घेण्यात आलेली आहेत. या जलविज्ञान प्रकल्पाचा विस्तार राष्ट्रीय पातळीवर करण्यात आला असून, आता हा प्रकल्प राष्ट्रीय जलविज्ञान प्रकल्प या नावाने राबविण्यात येत आहे. राष्ट्रीय जलविज्ञान प्रकल्पांतर्गत प्राप्त होणारा निधी हा १००% अनुदान स्वरुपात असून, केंद्र शासनाने महाराष्ट्र राज्यासाठी घटकनिहाय रुपये ३६.०० कोटी एवढा निधी उपलब्ध करून दिला आहे.

राष्ट्रीय जलविज्ञान प्रकल्पांतर्गत जलशास्त्रीय माहिती प्रणाली, पूर नियंत्रणासाठी निर्णय सहाय्य प्रणाली, जलसंपत्तीचे संवर्धन या प्रकारची कामे हाती घ्यावयाची असून, जादा खोलीच्या विंधण छिद्र किंवा कूपनलिकांची दुरूस्ती किंवा पुनरूज्जीवन करणे, व्हिडीओ कॉन्फरन्स साठी साहित्य घेणे, यंत्रणेतील अधिकाऱ्यांना जलविज्ञान प्रकल्पासाठी उपयुक्त प्रशिक्षण देणे, भूजलाविषयी जनजागृती

मोहिम राबविणे या बाबी शिघ्र गतीने राबविण्यासाठी संचालनालयाने संदर्भाधीन क्र.२ येथील पत्रान्वये सादर केलेल्या मान्यताप्राप्त वार्षिक कृती आराखड्यातील साधनसामुग्री खरेदीच्या प्रस्तावास संदर्भाधीन क्र. ३ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग तीन, अनुक्रमांक चार परिच्छेद क्रमांक २७ (२) (अ) अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारानुसार प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी संदर्भाधीन क्र.२ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार राष्ट्रीय जलविज्ञान प्रकल्पामध्ये सन २०१८-२०१९ च्या मान्यताप्राप्त वार्षिक कृती आराखड्यामधील एकूण रकमेपैकी पहिला भाग म्हणून रक्कम रुपये २.९०६७ कोटी किंमतीच्या खालील बाबींच्या खरेदीस त्याखाली नमूद केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र | विवरण | नग | किंमत (रुपये लाखात) |
|---|---|---|---|
| 1 | DWLR with Telemetry For Existing GW Monitoring Well | 14 | 18.67 |
| 2 | IT equipment for Data Centre | 105 | 50.00 |
| 3 | Video Conferencing equipment | 6 | 90.00 |
| 4 | Vehicle mounted pumping test units for aquifer performance complete set | 3 | 45.00 |
| 5 | PDS for GW | 1 | 10.00 |
| 6 | Procurement of vehicles | 4 | 32.00 |
| 7 | Construction of state groundwater informatics and modeling center including engagement of Architecture | 1 | 10.00 |
| 8 | Development and maintenance of hydrology project web site | 1 | 10.00 |
| 9 | Development of Atlas | 1 | 15.00 |
| 10 | DSS Development for Aquifer based Integrated GW Management including sms based mobile application, IT hardware and software etc. | 1 | 10.00 |
| **Total** | | **133** | **290.67** |

वरील बाबींसाठी देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता ही खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) सदरहू सामुग्रीची आवश्यकता/मागणी याची संचालनालयाने शहानिशा/खातरजमा करावी व तदनंतरच या बाबींच्या खरेदीसाठी आवश्यक ती प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) या सामुग्रीचे विनिर्देश (Specifications) गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खात्री करण्यात यावी.

३) खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical Specifications) तज्ञांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसारच असावेत. तसेच सदर तांत्रिक विनिर्देश हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होतील अशा रीतीने नसल्याची खात्री करावी व त्यानंतरच खरेदी करण्यात यावी.

४) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठ्याअगोदर व पुरवठ्यानंतर नमुना तपासणी (Pre/post-dispatch random sample inspection) करून उचित व योग्य विनिर्देश असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्याची साठवणूक व वितरण (Storage and Distribution ) करणे तसेच पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूचित सामग्रीची दुरूस्ती देखभाल संदर्भात पुरवठादार उत्पादकांशी आवश्यक तो करार केला जाईल व व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करून या बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

६) सदर खरेदीवर होणारा खर्च राष्ट्रीय जलविज्ञान प्रकल्पांतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७) या सामुग्रीच्या खरेदीची द्विरूक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

८) या बाबींची संपुर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

९) खरेदी केलेल्या सामुग्रीच्या देखभाल दुरूस्तीसाठी पुरवठादाराशी आवश्यक तो देखभाल दुरूस्ती करार करण्यात यावा.

१०) संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे या साहित्याची खरेदी करण्याकरीता खालीलप्रमाणे खरेदी समिती नेमण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | पदनाम | कार्यालय | खरेदी समितीमधील पद |
|---|---|---|---|
| १ | अतिरिक्त संचालक | भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे. | अध्यक्ष |
| २ | सहसंचालक | भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे. | सदस्य |
| ३ | उपसंचालक, संशोधन व विकास कक्ष | भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे. | सदस्य |

| अ.क्र | पदनाम | कार्यालय | खरेदी समितीमधील पद |
|---|---|---|---|
| ४ | उपसंचालक, जलविज्ञान प्रकल्प | भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे. | सदस्य |
| ५ | सहसंचालक, महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा | भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे. | सदस्य |
| ६ | कक्ष अधिकारी (पापु-१५) | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (पापु-१५) | सदस्य |
| ७ | नियोजन अधिकारी | भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे. | सदस्य सचिव |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201808241614288228 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2018.08.24 16:28:01 +05'30'

**(चेतन निकम)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, गो.ते.रूग्णालय इमारत संकुल, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-०१
४. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजी नगर, पुणे
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
६. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
७. उपसंचालक, राष्ट्रीय जलविज्ञान प्रकल्प, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
८. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने
९. निवड नस्ती, कार्यासन (पापु-१५)